**भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील तांत्रिक अधिकारी (गट-क) हा संवर्ग एकाकी घोषित करणेबाबत**

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः आपना २०१६/प्र.क्र.३४०/पापु १५**

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॅाफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय इमारत, मुंबई-४००००१
तारीख: ५ ऑक्टोबर,२०१८

वाचा

१) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः आपना ४५०१/प्र.क्र.१०१/पापु १५, दि.३०.०६.२००३**
२) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः आपना ४५०१/प्र.क्र.१०१/पापु १५, दि.०४.०२.२००५**
३) **शासन शुध्दीपत्रक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः आपना ४५०१/प्र.क्र.१०१/पापु १५, दि.१२.०८.२००५**

प्रस्तावना

संदर्भाधिन क्र.१ व २ च्या शासन निर्णयान्वये भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेच्या आस्थापनेवरील पदांचा आकृतीबंध निश्चित करण्यात आला आहे. भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील तांत्रिक अधिकारी (गट-क) या पदास सदर आकृतीबंध अंतिम होण्यापूर्वी पदोन्नतीच्या संधी उपलब्ध नव्हत्या. संदर्भाधिन क्र.१ च्या निर्णयान्वये तांत्रिक अधिकारी व सांख्यिकी सहाय्यक या संवर्गाचे एकत्रिकरण करण्यात आले व त्याचे पदनाम सांख्यिकी सहाय्यक असे करण्यात आले. त्यानंतर या पदनामामध्ये संदर्भाधिन शासन शुध्दीपत्रकान्वये पुन्हा बदल करण्यात आला असून सांख्यिकी सहाय्यक या पदनामाऐवजी ते तांत्रिक अधिकारी असे करण्यात आले. तथापि या दोन संवर्गाच्या एकत्रिकरणानंतर तांत्रिक अधिकारी या संवर्गाच्या पदोन्नतीबाबत उक्त शासन निर्णयात स्पष्टपणे उल्लेख करण्यात न आल्याने तसेच त्यानंतर या संवर्गाचे सुधारीत सेवा प्रवेश नियम अंतिम न झाल्याने तांत्रिक अधिकारी या संवर्गातील कर्मचा-यांना पदोन्नतीच्या संधीच उपलब्ध झालेल्या नाहीत. यास्तव भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील तांत्रिक अधिकारी संवर्ग एकाकी घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

### शासन निर्णय

संदर्भाधिन क्र.१ व २ च्या शासन निर्णयान्वये भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेच्या आस्थापनेवरील पदांचा आकृतीबंध निश्चित केल्यानंतर यंत्रणेतील तांत्रिक अधिकारी या संवर्गाकरीता सदर शासन निर्णयात पदोन्नती बाबत स्पष्ट तरतुद करण्यात आलेली नाही. तसेच या पदाचे सुधारीत सेवाप्रवेश नियम तयार करण्याची कार्यवाही अंतिम झालेली नसल्याने भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील तांत्रिक अधिकारी (गट-क) या

संवर्गास पदोन्नतीचे लाभ प्राप्त झालेले नाहीत. ही बाब विचारात घेता भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील तांत्रिक अधिकारी (गट-क) हा संवर्ग संदर्भाधिन क्र.१ च्या शासन निर्णयाच्या तारखेपासून एकाकी घोषित करण्यात येत आहे. एकाकी संवर्गास प्रचलित शासन निर्णयानुसार अनुज्ञेय असलेले सर्व लाभ भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील तांत्रिक अधिकारी या संवर्गास लागू राहतील.

सदर शासन निर्णय हा वित्त विभागाचे अनौपचारीक संदर्भ.क्र.२४१/१८/सेवा-३, दि.२१.०५.२०१८ च्या प्राप्त अभिप्रायास अनुसरुन निर्गमित करण्यात आले आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००५१३०७१३३९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WSSD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2018.10.05 16:40:33 +05'30'

**(चेतन निकम)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
२. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व)
३. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व)
४. निवडनस्ती कार्यासन पापु -१५